**वसई ते कल्याण या राष्ट्रीय जलमार्ग क्र. ५३ अंतर्गत जलवाहतूक सुरु करणेसाठी प्रस्तावित कामांच्या रू.९९.६८ कोटी इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांकः एमआयएस ०५२१/प्र.क्र.४७/बंदरे-२**

गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक :- १५ फेब्रुवारी, २०२२

**वाचा :-** मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई यांचे पत्र क्र. ममेबो/मुकाअ /अभि-१/NW-५३/१८९७, दिनांक १९.०४.२०२१

**प्रस्तावना:**

ठाणे, मिरा-भाईंदर, वसई, डोंबिवली व कल्याण या शहरातील वाढत्या लोकसंख्यामुळे शहरातील वाहतुकीवर प्रंचड ताण येत असून वाहतूक कोंडीची समस्या उद्भवत आहे. आजही ह्या जिल्हयांमध्ये अशी काही ठिकाणे आहेत की जी रस्त्याने प्रवास केल्यास मोठे अंतर कापावे लागते व पर्यायाने जास्त वेळ व इंधन वाया जाते. तथापि या ठिकाणी अंतर्गत जलवाहतूक मार्ग उपलब्ध असून ह्या मार्गावर जलवाहतुकीची सेवा उपलब्ध करुन दिल्यास वाहतुक कोंडी कमी होण्यास मदत होईल. तसेच किनारपट्टीवरील नागरीकांना/पर्यटकांना याचा मोठा फायदा होऊ शकतो, स्थानिकांना रोजगाराची संधी उपलब्ध होऊ शकते. ह्या दृष्टीकोनातून वसई खाडी मध्ये वसई ते कल्याण असा (राष्ट्रीय जलमार्ग-५३) पर्यावरण पूरक जल वाहतुकीचा प्रकल्प हाती घेण्यात येणार आहे.

त्यानुसार वसई ते कल्याण या राष्ट्रीय जालामार्ग क्र. ५३ अंतर्गत जलवाहतूक सुरु करणेसाठी प्रस्तावित कामांचा प्रस्ताव मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांनी सादर केला असून सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

सागरमाला कार्यक्रमांतर्गत वसई ते कल्याण या राष्ट्रीय जलमार्ग क्र. ५३ अंतर्गत जलवाहतूक सुरु करणेसाठी प्रस्तावित कामांच्या रू.९९.६८ कोटी इतक्या रकमेच्या ढोबळ अंदाजपत्रकास खालील तक्त्यात दर्शविलेल्या रकमेच्या मर्यादेत प्रशासकिय मान्यता देण्यात येत आहे. सदर कामांना केंद्र शासनाकडून सागरमाला कार्यक्रमांतर्गत मान्यता प्राप्त झाली आहे. सदर प्रकल्प कार्यान्वित करणेस महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास प्राधिकृत करण्यात आले आहे.

सदर ०४ प्रस्तावाचा वाव व किंमतीचा तपशील पुढील प्रमाणे आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | अंदाजित किंमत |
|---|---|---|
| १ | डोंबिवली जि.ठाणे येथे जेट्टी बांधकाम करणे | २१,३०,१३,०८३.०० |
| २ | कालशेत जि.ठाणे जेट्टी बांधकाम करणे | ३०,३६,१८,२६८.०० |
| ३ | मीरा भाईंदर जि.ठाणे जेट्टी बांधकाम करणे | २४,४६,२१,२२७.०० |
| ४ | काल्हेर जि.ठाणे जेट्टी बांधकाम करणे | २३,५५,४२,४९०.०० |
| | **एकूण** | **९९,६७,९५,०६८.००** |

२. सदर कामास पर्यावरण तसेच इतर अनुषंगिक विभागांच्या आवश्यक परवानग्या घेण्यात याव्यात.

३. सदर कामांना केंद्र शासनाकडून मान्यता प्राप्त असल्याने केंद्राचा आर्थिक हिस्सा प्राप्त करण्याची कार्यवाही महाराष्ट्र मेरिटाईम बोर्ड यांनी तात्काळ करावी.

४. वरील कामांवरील खर्च "मागणी क्र. बी-७, ३०५१ - बंदरे व दिपगृह ०२, लहान बंदरे, १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना सहाय्य, (००) (०३) जेट्टीच्या बांधकामाकरीता केंद्राचे सहाय्य (सागरमाला) (राज्य हिस्सा ५०%) (३०५१ १८९१), ३५ भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान" या लेखाशिर्षाखाली मंजुर तरतुदीतून भागविण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय केंद्र शासनाच्या सागरमाला कार्यक्रमास मान्यता देणेबाबतच्या मा.मंत्रिमंडळाच्या दि.१९.०९.२०१७ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार आणि सार्वजनिक बांधकाम विभाग अनौपरिक संदर्भ क्र. अनौसंक्र. ५/रा.म.-२ दि.०४.०८.२०२१ नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. अनौस.१७८/ का.१४६१, दिनांक २३.१२.२०२१ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१८/२०२२/व्यय-८, दिनांक १८.०१.२०२२ अन्वये निर्गमीत करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२१७१६४६५६८३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA MOTIRAM HOLKAR

Digitally signed by RAJENDRA MOTIRAM HOLKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ac1bf43d6978ca6d925e9240f8c09bf2f3128ad5d62a0dd7d57d2b72c9ea41f4, pseudonym=D247A5CA6B26BCB0990C6082FBF829BF9C8E55B1, serialNumber=48F41D082A9DD86B54CCCF5B4C6A83A6132C3F6F06A9940BD960612800458BA7, cn=RAJENDRA MOTIRAM HOLKAR
Date: 2022.02.17 16:48:49 +05'30'

**( रा. मो. होळकर )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव,

२. मा. राज्यमंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव,

३. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.

४. अपर मुख्य सचिव (परिवहन व बंदरे), मंत्रालय, मुंबई,

५. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२.
९. नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
१०. निवडनस्ती (बंदरे-२).